ताजबाग विकास आराखडा निधी
वितरणाबाबत - सन २०१७-१८

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ताविआ २०१७/प्र.क्र.४/का.१४४३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : ०९ जून, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांक : ताविआ २०१३/ प्र.क्र. १६/का.१४४३, दि.३०.९.२०१३.
२) जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर यांचे क्र.जिनिस/कार्या-३७ /प.यो./५२१/२०१७, दि.५.४.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्गा विदेशातील भाविकांचे श्रध्दास्थान असल्याने त्या जागेचे महत्व लक्षात घेऊन या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्याच्या कामांसाठी दि.३०.९.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, नागपूर यांच्या दि. ५.४.२०१७ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्ग्याच्या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्यात आला असून सन २०१७-१८ या वर्षासाठी रु. ३०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. जिल्हाधिकारी, नागपूर यांनी मासिक निधी वितरणात (Cashflow) मागणी केल्यानुसार रु. १५००.०० लक्ष ( रुपये पंधराशे लक्ष फक्त ) निधी वितरीत करण्यात मान्यता देण्यात येत असून खालीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय वाटप करण्यात येत आहे.

| उद्दिष्टनिहाय बाब | रुपये ( लाखात ) |
|---|---|
| ५३, मोठी बांधकामे | १५००.०० |

२. सदरहू खर्च लेखाशीर्ष " मागणी क्र. ओ-१०, मुख्य लेखाशीर्ष भांडवली खर्च,( ०१ ) पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्रे (००),(००)(०२) ताजबाग विकास योजना, जिल्हा नागपूर ( ५४५२ ००७१ ) योजनांतर्गत " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशीर्षातर्गंत झालेल्या प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाच्या दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि.१८.४.२०१७ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६०९१२२७४९४९१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yatin Arvind Pimpley

Digitally signed by Yatin Arvind Pimpley
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0caa48d6ba1e76bde48feb1f45845828c289933f651f16d330b6ebf2a692991f, cn=Yatin Arvind Pimpley
Date: 2017.06.09 12:24:48 +05'30'

**( य.अ.पिंपळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१,मुंबई.
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग ( व्यय-८ ) / ( व्यय-१६ ), मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. जिल्हाधिकारी, नागपूर.
६. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
७. आयुक्त, महानगरपालिका, नागपूर.
८. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर.
९. जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर.
१०. निवड नस्ती, का.१४४३,नि.वि.,मंत्रालय, मुंबई.